**मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या औरंगाबाद खंडपीठ येथे नव्याने बांधलेल्या विस्तारित इमारतीमध्ये १ Gbps इंटरनेट Lease Line Connectivity उपलब्ध करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६४/का. ०७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८ मे, २०२३.

**वाचा** :- १) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई- कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.Adm./Comp./१६०२४/२०२१, दिनांक १४.१०.२०२२.
२) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई- कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र. Comp./Sec./०१०/२०२३ दिनांक १४.०३.२०२३.
३) माहिती तंत्रज्ञान संचालनालय (सा.प्र.वि.), शासन निर्णय क्र.DIT/०८/७१ /३९, दिनांक २२.१.२०१५.
४) प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक २४.०४.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना** :-

केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांच्या संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या औरंगाबाद खंडपीठ येथे नव्याने बांधलेल्या विस्तारित इमारतीमध्ये १ Gbps इंटरनेट Lease Line Connectivity उपलब्ध करण्यास व याकरिता वार्षिक आवर्ती खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर केला आहे. त्यानुसार सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :-

मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या औरंगाबाद खंडपीठ येथे नव्याने बांधलेल्या विस्तारित इमारतीमध्ये १ Gbps इंटरनेट Lease Line Connectivity उपलब्ध करण्याकरिता पहिल्या वर्षाकरिता येणाऱ्या रु. २४,४६,५००/- व दुसऱ्या वर्षापासून रु.२२,८०,०००/- इतक्या खर्चास याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यानुषंगाने Bharat Sanchar Nigam Ltd. कडून १ Gbps Lease Line Connectivity घेण्यासाठी येणाऱ्या खर्चाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| Leased Line Type | Bandwidth | BSNL offered Annual Rate in Rs. | One time charges | Total | |
|---|---|---|---|---|---|
| | | | for media connectivity | For first year | From Second year |
| Internet | 1 Gbps Leased Line | 22,80,000/- | 1,66,500/- | 24,46,500/- | 22,80,000/- |

३. याप्रित्यर्थ येणारा खर्च हा “मागणी क्र.जे-१, २०१४-न्यायदान, १०२-उच्च न्यायालये, (भारित) (०३) (०१) प्रबंधक, अपील शाखा, (२०१४ ००९२)” या लेखाशीर्षातील “०६-दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क” या उद्दिष्टांतर्गत संबंधित वर्षात मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र. क्र. ३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-१ उप विभाग-३ मधील अ. क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५१८१६२४४८१५१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKISHOR LALLU MORE

Digitally signed by NANDKISHOR LALLU MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=8e6e6ef027afaf311b73f55b93d66802f7572a95024328e2d647f7ef65a9432a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69426D4C260E75A2AE012E47A93A468B42FD9B82A0B40FBCADEA1F0C509379CC, cn=NANDKISHOR LALLU MORE
Date: 2023.05.18 16:25:06 +05'30'

**(नंदकिशोर ल. मोरे)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
३. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता),-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
५. प्रबंधक (वित्त व अर्थसंकल्प), अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
६.प्रबंधक (प्रशासन), मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद, औरंगाबाद.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
८. कार्यासन अधिकारी-४, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. निवड नस्ती.